
तीन प्रश्न
लिओ टॉलस्टॉय यांच्या
कथेवर आधारित
लेखक व चित्रे: जॉन म्यूथ
मराठी अनुवाद: सुशील मेन्सन

एकदा एक मुलगा होता, *निकोलाय* नावाचा. त्याला कधीकधी कसं वागायचं हे कळतच नसे. “मला चांगला माणूस बनायचंय,” तो त्याच्या प्राणी मित्रांना सांगत असे. “पण कसं बनायचं हेच मला कळत नाही.”

निकोलायच्या मित्रांना त्याची समस्या उमगली. त्यांना त्याला मदत करावीशी वाटली.

“जर मला माझ्या तीन प्रश्नांची उत्तरं सापडली,” निकोलाय पुढे बोलू लागला, “तर नेमकं काय करायचं हे मला कळू शकेल.”

सर्वात महत्त्वाची वेळ कोणती?

सर्वात महत्त्वाची व्यक्ती कोण?

सर्वात महत्त्वाची कृती कोणती?

निकोलायच्या मित्रांनी त्याच्या पहिल्या प्रश्नावर विचार केला.
*सोन्या* नावाचा बगळा बोलला, "सर्वात महत्त्वाची वेळ कोणती,
हे कळण्यासाठी आधीपासून योजना आखली पाहिजे."



*गोगोल* नावाचं माकड पानांच्या ढिगाऱ्यात काही खायला शोधत होतं. ते म्हणालं, "निरीक्षण केलं आणि काळजीपूर्वक लक्ष दिलं तर सर्वात महत्त्वाची वेळ कोणती, हे आपल्याला कळू शकेल."





डुलक्या काढणारा *पुश्कीन* नावाचा कुत्रा पलटून म्हणाला, "आपण एकटंच सगळ्या गोष्टींकडे लक्ष देऊ शकत नाही. लक्ष देण्यासाठी, कृती कधी करायची हे ठरवण्यात मदत करण्यासाठी आपल्याला कळपाची गरज असते. उदाहरणार्थ, गोगोल, अरे तुझ्या डोक्यावर एक नारळ पडण्याची शक्यता आहे. बघ बाबा, सांभाळ!"

निकोलायने थोडा विचार केला आणि दुसरा प्रश्न विचारला, “सर्वात महत्त्वाची व्यक्ती कोण?”



“जी स्वर्गाच्या सर्वात जवळ आहे ती,” आभाळात घिरट्या घालणारा सोन्या म्हणाला.

“जी जखमींवर उपचार करते ती,” गोगोल आपल्या डोक्याची जखम कुरवाळत म्हणाला.



“जी नियम बनवते ती,” पुश्कीन गुरगुरला.



निकोलायने आणखी थोडा विचार केला. मग त्याने आपला तिसरा प्रश्न विचारला, “सर्वात महत्त्वाची कृती कोणती?”
“उडण्याची,” सोन्या म्हणाला.
“मौजमजा करण्याची,” म्हणत गोगोल हसू लागला.
“मारामारी,” पुश्कीन भुंकत म्हणाला.

निकोलाय खूप वेळ विचार करत राहिला. त्याचं आपल्या या मित्रांवर खूप प्रेम होतं. ते सगळे आपल्या प्रश्नांची उत्तरं मिळवण्यात मदत करत आहेत, याची त्याला जाणीव होती. पण त्यांची उत्तरं निकोलायला योग्य वाटली नाहीत.

अचानक त्याच्या मनात काही आलं. *लिओ* कासवाला विचारलं तर! तो या पृथ्वीवर दीर्घकाळापासून आहे. त्याला माझ्या प्रश्नांची उत्तरं नक्की माहीत असतील.

निकोलाय उंच डोंगरावर चढू लागला. या डोंगरावर वृद्ध कासव एकटंच राहात होतं.



निकोलाय तिथे पोहोचला, तेव्हा लिओ त्याच्या बागेतील माती खणत होतं.
वृद्ध असल्यामुळे त्याला माती खणणं कठीण जात होतं.
“मला तीन प्रश्न पडलेयत. त्यांची उत्तरं मिळवायला मला तुमची मदत हवीय,”
निकोलाय म्हणाला.
“सर्वात महत्त्वाची वेळ कोणती? सर्वात महत्त्वाची व्यक्ती कोण? सर्वात महत्त्वाची कृती कोणती?”



लिओने लक्षपूर्वक ऐकलं, पण त्याने फक्त स्मित केलं आणि तो पुन्हा माती खणू लागला.
“थकला असाल तुम्ही,” निकोलाय म्हणाला. “मला मदत करू द्या.”
कासवाने आभार मानून आपला फावडा त्याच्याकडे दिला.
एका वृद्ध कासवाच्या तुलनेत एका तरूण मुलाला खणण्याचं काम करणं सोपं होतं. निकोलायने थोड्याच वेळात खोदकाम पूर्ण केलं.

त्याचं काम पूर्ण झालं त्याचवेळी वारे वेगाने वाहू लागले. काळ्या ढगांतून मुसळधार पाऊस बरसू लागला. आसऱ्यासाठी ते लगेच झोपडीकडे पळाले. अचानक निकोलायला कुणाचंतरी मदतीसाठी ओरडणं ऐकू आलं.

निकोलाय वेगाने धावला. एका पांडाच्या पायावर झाड पडून तो जखमी झाला आहे, असं दृश्य त्याला दिसलं.



निकोलायने पांडाला काळजीपूर्वक लिओच्या घरी आणलं. त्याने पांडाच्या जखमी पायाला आधार देण्यासाठी बांबूच्या लाकडाची एक फळी बनवली.

वादळाचा जोर वाढला. घराची दारं-खिडक्या वाजू लागली. पांडा जागी झाली.
“कुठाय मी?” ती म्हणाली. “आणि माझं बाळ कुठाय?”

निकोलाय झोपडीतून बाहेर पडला आणि धावू लागला. वादळ कर्णकर्कश गर्जना करत होतं. पिसाटलेल्या वाऱ्याला आणि मुसळधार पावसाला तोंड देत तो गर्द जंगलात शिरला. तिथे त्याला थंडीने गारठलेलं पांडाचं बाळ जमिनीवर निपचित पडलेलं दिसलं.

छोटासा पांडा चिंब भिजला होता, घाबरलाही होता, पण जिवंत होता. निकोलायने त्याला घरात नेलं, पुसलं, सुकवलं आणि ऊब दिली. मग त्याने बाळाला त्याच्या आईच्या कुशीत ठेवलं.

निकोलायची ही कृती पाहून लिओने स्मित केलं.

पुढल्या दिवशी सूर्याने उबदार दर्शन दिलं, पक्षी किलबिलाट करू लागले. जग आधीसारखंच शांत, सुंदर दिसू लागलं. पांडाच्या पायाची जखम बरी होत होती. वादळात तिला आणि तिच्या बाळाला वाचवल्याबद्दल तिने निकोलायचे आभार मानले.

त्याचवेळी, सोन्या, गोगोल आणि पुश्कीन तिथे आले, सगळं काही आलबेल आहे याची खात्री करून घेण्यासाठी.

निकोलायला खूप शांत वाटू लागलं. त्याला खूप चांगले मित्र लाभले होते. त्याने पांडा आणि तिच्या बाळाला वाचवलं होतं. पण त्याला थोडंसं निराशही वाटू लागलं. त्याला त्याच्या प्रश्नांची उत्तरं अद्याप मिळाली नव्हती. म्हणून त्याने आणखी एकदा लिओला विचारलं.





वृद्ध कासवाने निकोलायकडे बघितलं. “पण तुला तुझ्या प्रश्नांची उत्तरं तर मिळालीयत!” कासव म्हणालं.

“मिळालीयत?” निकोलायने विचारलं.

“काल जर मला खणायला मदत करण्यासाठी तू थांबला नसतास, तर तुला पांडाने मदतीसाठी दिलेली हाक ऐकूच आली नसती. त्यामुळे तू बागेत खणत होतास, ती वेळ सर्वात महत्त्वाची होती. त्यावेळी, सर्वात महत्वाची व्यक्ती होतो मी आणि सर्वात महत्त्वाची कृती होती, तू मला मदत करणं ही.

नंतर, तुला जखमी पांडा दिसली. तू तिच्या पायावर उपचार केलेस आणि तिच्या बाळाला वाचवलंस, ती वेळ सर्वात महत्त्वाची होती. त्यावेळी, पांडा आणि तिचं बाळ या महत्त्वाच्या व्यक्ती होत्या. आणि त्यांची काळजी घेणं, त्यांना सुरक्षित ठेवणं या सर्वात महत्त्वाच्या कृती होत्या.”

“लक्षात ठेव, सर्वात महत्त्वाची वेळ असते, आत्ताचा क्षण. सर्वात महत्त्वाची व्यक्ती असते, याक्षणी आपल्यासोबत असणारं कुणीतरी. आणि सर्वात महत्त्वाची कृती असते, आपल्याबाजूने उभं राहाणाऱ्याचं भलं करणं. जगात सर्वात महत्त्वाचं काय आहे, याची हीच उत्तरं आहेत मुला.”





“यासाठीच आपण इथे आहोत.”

## लेखकाचं मनोगत

खूप वर्षांपूर्वी, मला व्हिएतनामी झेन तज्ज्ञ *थिच न्हात हान्ह* यांच्या एका जुन्या पुस्तकात *तीन प्रश्न* या कथेचा संदर्भ मिळाला. मी पहिल्यांदाच ही गोष्ट वाचली तेव्हा मला वाटलं जणू एखादी सोन्याची घंटीच माझ्या मनात किणकिणत आहे. अचानक मला जाणवलं की ही गोष्ट तर मला तोंडपाठ झाली आहे. काही पुस्तकं आपल्याला पुरेपूर भारून टाकतात – माझ्या बाबतीत खास करून लिओ टॉलस्टॉयची पुस्तकं.

मूळ गोष्टीत मुलगा आणि त्याचे प्राणी मित्र नाहीत, तर सोव्हिएत युनियन देशाचा *झार (राजा)* आहे, जो तीन प्रश्नांची उत्तरं शोधत आहे. त्याचं धाडस वेगळ्या प्रकारचं होतं. तो पांडा आणि त्याच्या बाळाला वाचवत नाही, तर चुकून आपल्या शत्रुला वाचवतो. यामुळे त्या दोघांमध्ये एक जिव्हाळ्याचं नातं बनतं. गूढ मानवी नात्यांचा अभ्यास करणाऱ्या वाचकांनी टॉलस्टॉयची याच नावाची मूळ गोष्ट वाचावी, असं मी सुचवतो.

मला ही गोष्ट छोट्या मुलांना ऐकवायची होती. त्यामुळे या गोष्टीचं स्वरूप मूळ गोष्टीपेक्षा वेगळं ठेवलं. माझ्या या गोष्टीमुळे टॉलस्टॉयचा सन्मानच होईल, असं मला वाटतं. कदाचित त्यांच्या चेहऱ्यावर मंद स्मितही फुलू शकेल. या गोष्टीतील प्राण्यांची नावं मी अनेक ठिकाणांहून घेतलेली आहेत.

*पुश्कीन* आणि *गोगोल* ही रशियाच्या प्रसिद्ध लेखकांची नावं आहेत. टॉलस्टॉयच्या पत्नीचं नाव *सोन्या* होतं. *निकोलाय* हे टॉलस्टॉयच्या भावाचं नाव होतं आणि माझ्या मुलाचंसुद्धा, ज्याचा मी पुस्तकातील चित्रांसाठी मॉडेल म्हणून विचार केला. पुश्कीन हा माझ्या *रेमंड* नावाच्या कुत्र्याच्या रुपात चित्रात दाखवला आहे. गोष्टीतील बाळ पांडा म्हणजे, माझी मुलगी *अॅडलीन* आणि शहाणं कासव *लिओ* म्हणजे, खुद्द टॉलस्टॉय!



काउंट लिओ टॉलस्टॉय (1828 – 1910) हे रशियाचे महान कादंबरीकार, नैतिक तत्वज्ञ आणि समाजसुधारक यांच्यात गणले जातात. *वॉर अँड पीस* (1865 – 1869) आणि *अॅना कॅरेनिना* (1875 – 1877) या कादंबऱ्यांसाठी त्यांना प्रामुख्याने ओळखले जाते. शिवाय, ते एकोणीसाव्या शतकातील थोर विचारवंतही होते. त्यांची लघुकथा *तीन प्रश्न*, ज्यावर हे पुस्तक आधारित आहे, 1903 साली प्रकाशित झाली होती.

